कृषि विभागाच्या पुनर्रचनेसाठी समिती
गठीत करणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन आदेश क्र. आकृवि-१२११ /प्रक्र-१६८ /१५ए**
**मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक : २६ सप्टेबर , २०११.**

**वाचा :-** शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग, क्र.आकृवि १२०८/प्र.क्र.७२/१५अे, दि.२२.५.२००९

**प्रस्तावना -**

दिनांक १.७.१९९८ रोजी कृषि विभागाची पुनर्रचना करण्यात येऊन एक खिडकी योजना अस्तित्वात आली जागतिक हवामान बदल, आंतरराष्ट्रीय व्यापार, शेतीविषयक विविध प्रमाणिकरणाच्या पध्दती आणि बदलती सामाजिक रचना, नव्याने सुरु केलेल्या विविध योजना यामुळे कृषि क्षेत्रासमोरिल निर्माण झालेल्या विविध आव्हानांना सक्षमरित्या सामोरे जाण्यासाठी कृषि विभागाच्या सध्याच्या रचनेत आवश्यक असणारे बदल सुचविण्यासाठी आयुक्त (कृषि) यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश :-**

कृषि विभागाच्या सध्याच्या रचनेत आवश्यक असणारे बदल सुचविण्यासाठी खालीलप्रमाणे समितीची रचना करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

१. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे - अध्यक्ष
२. सह सचिव/उप सचिव (आस्थापना), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - सदस्य सचिव
३. संचालक (सर्व ), कृषि विभाग - सदस्य
४. कृषि विभागातील सर्व संवर्गांच्या संघटनांचे प्रतिनिधी - सदस्य
५. कृषि विभागातील दोन सेवानिवृत्त अधिकारी - सदस्य
६. कृषि विभागातील दोन जाणकार अधिकारी - सदस्य

अ.क्र. ४,५ व ६ मध्ये नमुद सदस्य व आवश्यकतेनुसार निमंत्रित म्हणुन इतर अधिकच्या सदस्यांची निवड आयुक्त (कृषि) यांनी करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

**( संदिप ढाकणे )**
**कक्ष अधिकारी , महाराष्ट्र शासन**

प्रति,

आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे

कुलगुरु, सर्व कृषि विद्यापीठे
सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, पुणे
सर्व कृषि संघटनांचे प्रतिनिधी ( व्दारा कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे )
निवड नस्ती/१५अे